**महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ (राज्यस्तर) योजनेसाठी नवीन लेखाशिर्ष निर्माण करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग**
**शासन निर्णय क्र. कृकमा १२१९/ प्र.क्र.१६० /२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २८ जानेवारी, २०२०

वाचा :- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा १२१९/प्र. क्र. १५७/२-स, दि. २७.१२.२०१९.

**प्रस्तावना :-**

सन २०१५-१६ ते २०१८-१९ या सलग चार वर्षात राज्यातील विविध भागात दुष्काळसदृष्य परिस्थिती निर्माण झाल्यामुळे मोठ्या प्रमाणात ५० पैसेपेक्षा कमी पैसेवारी जाहिर करण्यात आली होती. तसेच राज्यात अवेळी पाऊस झाल्यामुळे शेतकऱ्यांचे मोठ्या प्रमाणावर नुकसान झाले होते. या नैसर्गिक आपत्तीच्या पार्श्वभूमीवर शेतकऱ्यांचे नुकसान झाल्यामुळे काही वर्षात शेती निगडीत कर्जाची मुदतीत परतफेड होऊ शकली नाही. परिणामी शेतकरी थकबाकीदार झाल्यामुळे कर्जाच्या दृष्टचक्रात अडकलेला आहे आणि त्यांना शेती कामांकरीता नव्याने पीक कर्ज घेण्यास अडचणी निर्माण झाल्या आहेत. शेतकऱ्यांना कर्जाच्या दुष्टचक्रातून बाहेर काढून चिंतामुक्त करण्याच्या हेतूने मा. मुख्यमंत्री महोदय यांनी हिवाळी अधिवेशन, २०१९ मध्ये “महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९” जाहीर केली आहे. त्याअनुषंगाने “वाचा” येथील शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

सदर योजनेवरील खर्चाकरीता पुढील प्रमाणे नवीन मुख्यलेखाशिर्ष निर्माण करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९” या योजनेवरील खर्चाकरिता खालील प्रमाणे नवीन लेखाशिर्ष निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| मागणी क्रमांक व्ही - ०२<br>२४३५ - इतर कृषीविषयक कार्यक्रम<br>००<br>६० - इतर<br>१०१ - शेतकऱ्यांसाठी कर्जमाफी योजना<br>(००)(०३) महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ (राज्यस्तर) (कार्यक्रम)<br>(२४३५ ०१४२) ३३-अर्थसहाय्य | Demand No. V-2<br>2435 - Other Agriculture Program<br>00<br>60 - Other<br>101 - Scheme for Debt relief to Farmers<br>(00)(03) Mahatma Jotirao Phule Shetkari Karjamukti Yojana 2019 (State Level) (Scheme)<br>(2435 0142) 33-Subsidies |

२. या योजनेवरील खर्चासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन), सहकार आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय, नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक ०१/२०२०/१४३१ दिनांक ०२.०१.२०२० व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक ०६/२०२०/व्यय-२ दिनांक ०७.०१.२०२० अन्वये व महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई यांचे अनौपचारीक संदर्भ क्र. ख.वि/चा-१ सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग/ युओआर-१६६/२०१९-२०/१०१४ दिनांक २३.०१.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००१२८१३१२५२८६०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Ramesh
Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.01.28 13:14:15 +05'30'

**( रमेश शिंगटे )**
अवर सचिव तथा सहनिबंधक
सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-२, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.
५) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, पुणे.
६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
७) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
९) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१३/ व्यय-२), / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अवर सचिव (कार्यासन १७-स), सहकार, पणन वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती (कार्यासन २-स).